ISBN 81-237-0472-0

पहिली आवृत्ती 1973 (शके 1895)
आठवी आवृत्ती 1999 (शके 1921)

रु. 10.00
Stories of Valour (*Marathi*)
संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
ए-5, ग्रीन पार्क, नवी दिल्ली 110016 यांनी प्रकाशित केले.

नेहरू बाल पुस्तकालय

# वीरांच्या कथा

राजेन्द्र अवस्थी

चित्रकार

शरदिंदु सेन राय

अनुवादक

शोभा वराडपांडे



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

रात्री श्रावणकुमाराने आपल्या आंधळ्या मातापित्यांना जेऊ घातले, मग अत्यंत काळजीपूर्वक त्यांचे बिछाने घातले. जेव्हा ती दोघे बिछान्यावर पहुडली तेव्हा श्रावण आपल्या पित्याचे पाय दाबू लागला. हा त्याचा नित्यनियमच होता. त्यांच्याशी गप्पागोष्टी करता करता श्रावण म्हणाला, 'आज दक्षिणेतून काही यात्रेकरू आले होते, बाबा! तीर्थक्षेत्रांची यात्रा करायला निघाले होते ते. आज आपल्या गावातूनच गेली ही मंडळी. किती सुंदर कीर्तन म्हणत होते ते. गाताना शरीराची सुद्धा शुद्ध विसरले होते. काही यात्रेकरू तर लंगडेलुळे होते.'

वृद्ध पिता निःश्वास टाकीत म्हणाला, 'मुला, फार फार भाग्यवान आहेत ते लोक. आमचीही खूप इच्छा होती तीर्थयात्रा करावयाची, पण परमेश्वराने डोळ्याची ज्योतीच हिरावून घेतली.......'

वृद्ध मातेने रागावून म्हटले, 'असं का म्हणता तुम्ही? आमचा मुलगाच आमचे डोळे आहे. परमेश्वराला का दोष देता. असा सुपुत्र आपल्या पोटी आला हे आपले भाग्य समजा!'

यावर श्रावण काही बोलला नाही परंतु वडिलांचे शब्द त्याच्या मनाला लागले. त्याचक्षणी आपल्या आईवडिलांना तीर्थयात्रा घडवण्याचा निश्चय त्याने केला. परंतु त्याने ही गोष्ट आपल्या मनातच ठेवली. आपल्या पत्नीला काही सांगितले नाही. तिला हे मुळीच आवडणार नाही हे त्याला ठाऊक होते.

त्या काळच्या प्रथेनुसार श्रावणाचा विवाह बालपणीच झाला होता. तो आपल्या पत्नीला नेहमी सांगायचा, जर तुला मी प्रसन्न राहावे असे वाटत असेल तर तनमनाने माझ्या आईवडिलांची सेवा कर. श्रावणासमोर तर त्याची पत्नी सासूसाऱ्याची खूप सेवा करी पण त्याची पाठ वळताच ती त्यांना टाकून बोले. नीट जेवायला देखील द्यायची नाही त्यांना. परंतु त्यांनी श्रावणाजवळ तिची तक्रार कधीच केली नाही, उलट ते श्रावणाजवळ तिची स्तुती करीत.

श्रावणाच्या मनात तीर्थयात्राच घोळू लागली. यात्रेची तयारी करून आईवडिलांना आपण त्याविषयी सांगू तेव्हा त्यांना किती आनंद होईल, याचा तो विचार करी. कदाचित ते जाण्यास तयार होणार नाहीत. कारण आपल्यापायी श्रावणाला त्रास व्हावा



हे त्यांना आवडणार नाही. पण तो त्यांचे मन वळवील. श्रावणाची तहानभूक हरपली. प्रत्येक क्षणी तो तीर्थयात्रेची योजना आखायचा. रस्त्यात आपल्या आईवडिलांना त्रास होऊ नये हीच त्याला काळजी होती. पुष्कळ विचार करता करता त्याला एक युक्ती सुचली.

दुसऱ्या दिवशी सर्व कामधाम उरकून श्रावण जवळच राहाणाऱ्या सुताराकडे गेला. श्रावणाला पाहून सुतार खुश झाला. त्याच्या मातृ-पितृ भक्तीमुळे गावातील लोक त्याच्यावर फार प्रेम करीत.

सुताराने विचारले, 'काय श्रावण, कसा आलास ?'

श्रावण म्हणाला, 'सुतारकाका, मला एक कावड बनवून द्या'

'कावड ?' सुताराने आश्चर्याने विचारले 'कावड घेऊन काय करशील ?'

श्रावण म्हणाला, 'माझ्या आई-बाबांना त्यात बसवून त्यांना तीर्थयात्रेला घेऊन जाईन. तीर्थयात्रा करायची फार इच्छा आहे त्यांची....पण बिचारे आंधळे आहेत ! केव्हा बनवून द्याल कावड काका ?'

सुतार आश्चर्यचकित होऊन श्रावणाकडे पाहात राहिला. तो म्हणाला, 'मुला' 'माझं ऐकशील जरा. तू अजून लहान आहेस. तीर्थयात्रेचा मार्ग अत्यंत दुर्गम आहे. संकटांनी भरलेला आहे. रस्त्यात पहाड आहेत, नद्या आहेत, जंगले आहेत, भयानक साप आहेत. तू यातून कसा पार पडू शकशील ?'



परंतु श्रावणाने काही एक ऐकले नाही. तो म्हणाला, 'काका, तुम्ही काही काळजी करू नका. फक्त मला आशीर्वाद द्या. आईवडिलांना तीर्थयात्रा घडविण्याचा संकल्प मी केला आहे. मी कोणाचे कधी वाईट केले नाही, मग कोणी माझे वाईट कशाला करील?'

श्रावणाच्या हट्टापुढे सुताराला झुकावे लागले, तो म्हणाला, 'बरं, तर तू संध्याकाळी ये. एक लहानशी मजबूत कावड तयार करून ठेवीन मी.'

सुताराच्या घरून निघून श्रावण यात्रेच्या तयारीला लागला. दिवसभर तो कामात राहिला. संध्याकाळी तो पुन्हा सुताराकडे गेला. सुताराने कावड करून ठेवली होती. ती देताना त्याने पुन्हा एकदा श्रावणाला समजावण्याचा प्रयत्न केला. परंतु श्रावणाने काही एक ऐकले नाही. आईवडिलांना तीर्थयात्रा घडविण्याची, त्यांची मनीषा पूर्ण करण्याची आकांक्षा



त्याच्या मनात घर करून बसली होती. सुताराला प्रणाम करून याने कावड उचलली व तो चालू लागला.

घरी जाऊन आपण उद्या पहाटेच यात्रेला जात असल्याचे त्याने आपल्या पत्नीला सांगितले. नंतर वृद्ध माता-पित्यांना सांगितले. त्यांनी वारंवार नाही म्हटले, शहाणपणाच्या चार गोष्टी सांगितल्या. पण जेव्हा श्रावण ऐकेना तेव्हा त्यांनी त्याला साफ नकार दिला. आपल्या आवडत्या मुलाने आपल्या-करता इतके कष्ट करावे हे त्यांना आवडले नाहीं. परंतु अखेरीस श्रावणाने त्यांचे मन वळविले. त्याच्या हट्टापुढे त्यांचे काही चालले नाही. श्रावण त्यांना म्हणाला, ‘रस्त्यात तुम्हाला मुळीच त्रास होणार नाही. मी सर्व व्यवस्था केली आहे.’

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे तो उठला. आपल्या आई-वडिलांची तयारी केली. त्यांना कावडीत बसविले व चालू लागला. संपूर्ण गाव हे अद्भुत दृश्य पाहाण्यास लोटले. त्यांचा कण कण श्रावणाला आशीर्वाद देत होता.

हळूहळू दिवस उगवला. रस्त्यावर रथ धावू लागले. चारीकडे गडबड सुरू झाली. पण श्रावणाला याची खबर नव्हती. तो आपल्याच धुंदीत चालला होता. रस्त्यावर जो कोणी त्याला पाही त्याचे डोळे श्रावणावर खिळून राही. एक सुकुमार बालक, खांद्यावर कावड आणि त्यात बसलेले आंधळे आईबाप. हे दृश्य पाहाणाऱ्याचे डोळे भरून येत. ‘धन्य आहेत ते आईबाप ज्यांच्या पोटी असा सुपुत्र जन्माला आला’ त्यांच्या तोंडून उद्गार निघत.

दिवस गेले, आठवडे गेले, महिने गेले........श्रावण रात्री विश्रांती घेई व सकाळी प्रवास करी. चालता चालता तो एका घनघोर जंगलात येऊन पोचला. जंगलातदेखील तो घाबरला नाही. उलट त्याला तिथे छानच वाटले. कधी पक्ष्यांचा किलबिलाट

ऐकू येई तर कधी सिंहाची भयानक गर्जना. समोरून भयभीत झालेले हरीण उड्या मारून निघून जाताना दिसत. ससांचे कळप एकामागोमाग पळत असताना दिसत. सिंहाने गर्जना करताच जंगलात भूकंप झाल्यासारखे वाटे. परंतु सिंहाची गर्जनादेखील श्रावणाला परावृत्त करू शकली नाही. तो कावड खांद्यावर घेऊन चालतच राहिला.

रात्र झाली. जंगलात शांतता पसरली. दिवसभराचे थकलेले पशुपक्षी आपापल्या निवाऱ्यात आराम करू लागले. परंतु श्रावणाच्या डोळ्यात झोप नव्हती. विचारमग्न अवस्थेत झाडाच्या बुंध्याला टेकून तो पहुडला होता. शेजारी कावड होती. त्याच्याजवळ त्याचे आईबाप झोपले होते. अचानक श्रावणाच्या वडिलांना जाग आली. त्यांनी श्रावणाला हाक मारून पाणी मागितले.

श्रावणाने पाण्याचा घडा पाहिला पण त्यात एक थेंबभरसुद्धा पाणी नव्हते. तो म्हणाला, 'बाबा, यात पाणी नाही. पण मी आता पाणी घेऊन येतो. जवळ एखादा तलाव किंवा झरा नक्की असेल.'

वडिलांनी त्याला आंधारात जाऊ नकोस म्हणून वारंवार विनवले. परंतु श्रावणाने वडिलांना तहानलेले राहू देणे कसे शक्य होते! घडा उचलून तो पाण्याच्या शोधार्थ निघाला.

थोड्या वेळात थंड हवा येत असलेली त्याला जाणवली. त्यावरून जवळच सरोवर किंवा नदी असल्याचा तर्क त्याने केला.



थोडे समोर जाताच त्याला नदीच्या पाण्याचा खळखळाट ऐकू येऊ लागला तो वेगाने त्या दिशेने धावू लागला. नदीच्या तीरावर पोचून घड्यात पाणी भरू लागला तसा बुडबुड असा आवाज येऊ लागला. इतक्यात कोठून तरी एक बाण सणसणत आला व श्रावणाच्या छातीत जाऊन घुसला. त्याचा करुण चीत्कार संपूर्ण जंगलात घुमला. झाडावर झोपलेले पक्षी पंख फडफडत उठून बसले. श्रावणाची किंकाळी दशरथ राजानेही ऐकली. तो बाण त्यानेच सोडला होता तो यावेळी एका झाडावर बसला होता. हत्तीची शिकार करण्यासाठी राजा तेथे आला होता. रिकाम्या घड्यात पाणी भरले जात असताना झालेला आवाज ऐकून राजाला वाटले की हत्तीच नदीवर पाणी पिण्यास आला आहे. त्याने मागचापुढचा विचार न करता बाण सोडला. किंकाळी ऐकून राजा हतबुद्ध झाला. ही तर माणसाची किंकाळी होती. राजाने झाडावरून खाली उडी मारली व तो आवाजाच्या दिशेने धावत निघाला. तेथे जाऊन पाहतो तो एक सुंदर किशोर जमिनीवर तडफडत आहे व बाण त्याच्या छातीत घुसला आहे. राजा ज्याला हत्ती समजला होता तो होता एक मानव, एक सुकुमार किशोर. त्याच्या पश्चात्तापाला सीमा राहिली नाही. आपल्या सभोवार धरती फिरत असल्यासारखे त्याला वाटले.

श्रावण आपल्या आईवडिलांना हाक मारीत होता. दशरथ श्रावणाजवळ गुडघे टेकून बसला, त्याचे मस्तक आपल्या मांडीवर घेतले. मोठ्या काळजीपूर्वक त्याने छातीत घुसलेला तीर उपसून काढला. तीर काढताच रक्ताचे कारंजे उसळले. भरलेल्या डोळ्याने दशरथ म्हणाला, 'बाळ, नकळत माझ्या हातून मोठे पाप झाले, मला क्षमा कर. मला वाटलं एखादा हत्ती नदीवर पाणी पिण्यास आला आहे.'

श्रावण अत्यंत कष्टाने म्हणाला, 'आपण राजे दिसत आहात. माझं फक्त एक काम करा. या वनात तिकडे माझे आईवडील बसले आहेत. मी त्यांच्याकरता पाणी न्यायला आलो होतो. ते तहानेने व्याकुळ झाले असतील. तुम्ही तेथे जाऊन हे पाणी त्यांना पाजा!' हलके हलके राजाने श्रावणाची सर्व कहाणी ऐकली.

'अरेरे! अशा विनयी व मातृपितृ-भक्त किशोराला माझ्या हाताने मृत्यू यावा ना?' असे म्हणत दशरथ रडू लागला व आपला धिक्कार करू लागला.

श्रावण म्हणाला, 'महाराज, आपण उशीर लावू नका....लवकर पाणी घेऊन जा....' हे बोलत असतानाच श्रावणाने प्राण सोडला.

दशरथाने श्रावणाचे शव उचलून खांद्यावर घेतले. एका हातात पाण्याचा घडा घेतला व श्रावणाच्या मातापित्याच्या शोधार्थ निघाला.

दुरून एका झाडाखाली कोणी बसले असल्याचे त्याला दिसले. तो तिकडे निघाला. पावलाचा आवाज ऐकून श्रावणाचे मातापिता एकदम म्हणाले, 'आलास बाळ, किती उशीर हा. तुला काही झालं की काय याचीच भीती आम्हाला वाटत होती. लवकर पाणी दे बाळा. ही तहान आता सोसवेनाशी झाली आहे!'

दशरथाचे हृदय जोराने धडधडत होते. त्याची मान लाजेने झुकली होती. त्यांच्या मुलाच्या मृत्यूचा समाचार त्यांना कसा द्यावा? कापणाऱ्या हातांनी त्याने पाण्याचे भांडे श्रावणाच्या पित्याला दिले. प्याला घेत वृद्ध म्हणाला, 'बोलत का नाहीस बाळ! तुला झालंय तरी काय?' मग अचानक साशंक स्वरांत त्यांनी विचारले, 'तू श्रावणच आहेस ना?'

'बाळा, बोलत का नाहीस तू? तू तर दुरूनच आई, म्हणत यायचास आज तुला काय झालं? तू बोलणार नसशील तर आम्हीही पाणी पिणार नाही.' वृद्ध माता म्हणाली.

आता दशरथाला उपाय राहिला नव्हता. पश्चात्तापदग्ध आवाजात तो म्हणाला 'मी आपला पुत्र आहे मातु:श्री. माझं नाव आहे दशरथ. तुमचा श्रावण...' बोलता बोलता राजाचा आवाज कंपित झाला.

वृद्धा एकदम ओरडली, 'बोल, पुढे बोल, आमच्या श्रावणाचं काय झालं?'

राजाने मोठ्या धैर्याने श्रावणाच्या मृत्यूचा समाचार त्यांना ऐकवला.

हे ऐकताच ते आक्रंदून उठले. त्यांच्या विलापाने सर्व अरण्य भरून गेले. अयोध्येचा प्रतापी राजा दशरथ अपराध्यासारखा खाली मान घालून उभा होता. त्यांना कसा धीर द्यावा हे त्याला समजत नव्हते. भरलेल्या आवाजात तो म्हणाला, 'मातु:श्री, आपण दोघे माझ्याबरोबर चला. मी तुमची सेवा करीन. आजपासून मीच तुमचा श्रावण.' पण त्यांनी त्याचे काही ऐकले नाही. ते म्हणाले, 'श्रावणाशिवाय आमचे जीवन व्यर्थ आहे. याच प्रकारे आपल्या पुत्राच्या वियोगाने तू तडफडशील तेव्हाच तुला आमच्या दु:खाची कल्पना येईल.'

हे ऐकून दशरथाच्या मनाचा थरकाप उडाला.

रडतारडता वृद्धांचे प्राण गेले. राजा दशरथाने आपल्या हाताने त्यांचा दहनसंस्कार केला व दुःखित मनाने तो राजधानीत परतला. त्याचे मन अशांत होते. त्याच्या डोळ्यांत झोप नव्हती.

अनेक वर्षांनंतर त्याचा पुत्र राम वनवासाला गेला तेव्हा शोकव्याकुळ दशरथाला श्रावणाच्या आईवडिलांचे बोल वारंवार आठवू लागले. 'राजन, आपल्या पुत्राच्या वियोगाने तू तडफडशील तेव्हाच तुला आमच्या दुःखाची कल्पना येईल.'



# गुरुदक्षिणा :

फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. हिरण्यधनु नावाचा एक भिल्लांचा राजा होता. अत्यंत प्रतापी आणि शूरवीर. मोठे मोठे क्षत्रिय राजेदेखील त्याचा धाक बाळगून होते.

हिरण्यधनूला एक मुलगा होता. त्याचे नाव होते एकलव्य. तोदेखील आपल्या वडिलांसारखाच साहसी व मन लावून काम करणारा होता. एखादे काम हाती घेतले की ते तो पूर्ण करूनच सोडी.

एके दिवशी एकलव्य जंग-लात एकटा फिरत असताना





अचानक त्याचे लक्ष शिकार करीत असलेल्या राजकुमारांकडे गेले. तो मुग्ध होऊन त्यांची नेमबाजी पाहात राहिला. त्याला वाटले, 'मलाही असाच बाण चालविता आला आणि नेम साधता आला तर किती छान होईल. मग कोणीही शिकारीत माझी बरोबरी करू शकणार नाही.'

लगेच राजकुमारांकडे जाऊन त्याने विचारले 'कुमार, आपण धनुर्विद्या कोणाजवळ शिकलात ? आपले गुरू कोण आहेत ?'

राजकुमाराचे ध्यान भंगले. त्याने काहीशा रागाने एकलव्याकडे पाहिले. मग अत्यंत रूक्षपणे तो म्हणाला, 'गुरू द्रोणाचार्य,'. एवढे बोलून आपल्याच तोऱ्यात तो दुसरीकडे निघून गेला. एकलव्याला त्याचा तोरा मुळीच आवडला नाही. पण त्याने तिकडे फारसे लक्ष दिले नाही. त्यावेळी त्याचे लक्ष दुसरीकडेच होते. 'आपल्याला देखील गुरू द्रोणाचार्यांजवळ शिकता आले तर त्या कुमाराप्रमाणे आपणदेखील एक कुशल धनुर्धर बनू' असा विचार त्याच्या मनात घोळत होता.

घरी पोचताच एकलव्याने गुरू द्रोणाचार्यांविषयी विचारले. हिरण्यधनूने एकलव्याला सांगितले की ते राजधानीत राहातात आणि धृतराष्ट्र महाराजांच्या राजकुमारांना धनुर्विद्या शिकवतात. 'बेटा एकलव्य' हिरण्यधनू म्हणाला, 'या पृथ्वीवर द्रोणाचार्यां-सारखा धनुर्धर दुसरा कोणी नाही.'

वडिलाच्या बोलण्याने एकलव्याच्या मनात उत्साह संचारला. तो म्हणाला 'बाबा, मी देखील आचार्य द्रोणांजवळ धनुर्विद्या शिकेन.' हिरण्यधनु चकित झाले. 'हे तर कदापिही शक्य नाही' त्यांच्या मनात आले. आचार्य द्रोण एका भिल्लकुमाराला कधीही धनुर्विद्या शिकविणार नाहीत. एकलव्याला समजावत ते म्हणाले 'बेटा,

आपल्या डोक्यातून तू ही कल्पना काढून टाक. आचार्य द्रोण तुला कधीही आपला शिष्य बनविणार नाहीत.'

'का नाही?' एकलव्याने आश्चर्याने विचारले.

'कारण तू क्षत्रिय नाहीस. आचार्य फक्त क्षत्रियकुमारांना, विशेषतः राजकुमारांना धनुर्विद्या शिकवितात. पण त्याने काही फारसं बिघडत नाही, मी येथेच तुला धनुर्विद्या शिकविण्याची सोय करीन.'

'नाही बाबा, नाही', एकलव्य आवेगाने म्हणाला, 'मी धनुर्विद्या शिकेन तर ती गुरू द्रोणाचार्यांपाशीच, तुम्ही फक्त परवानगी द्या मला'.

हिरणधनूला आपल्या मुलाचा स्वभाव माहीत होता. कोणाच्या थांबविल्याने तो थांबायचा नाही याची त्यांना जाणीव होती. एकलव्याचा हा गुण त्यांना आवडतही असे. कोणतेही काम पूर्ण करायला मनाच्या या तन्मयतेची गरज असते हे त्यांना ठाऊक होते. त्यांनी एकलव्याला राजधानीत जाण्याची परवानगी दिली.

दुसऱ्याच दिवशी एकलव्य राजधानीकडे जावयास निघाला. त्याचे मन अपूर्व उत्साहाने भरले होते. म्हणून एवढा लांब रस्ता कसा संपला हे त्याला कळलेदेखील नाही. राजधानीत आल्यावर द्रोणाचार्यांचा पत्ता विचारत विचारत



तो त्यांच्या आश्रमात येऊन पोचला. त्या वेळी गुरू द्रोणाचार्य आपल्या कुटीत बसून राजकुमारांना धनुर्विद्येचे सिद्धांत समजावून सांगत होते. कुटीच्या द्वारात उभ्या असलेल्या सावळ्या रंगाच्या एकलव्याला पाहून ते चकित झाले. कुटीत बसलेल्या राजकुमारांनादेखील आश्चर्य वाटले. या भिल्लाला पहारेकऱ्याने इथपर्यंत येऊ तरी कसे दिले? काही राजकुमारांना हे धाडस आवडले नाही. भिल्लकुमाराचे हे अचानक आगमन राजकुमारांना पसंत पडले नाही हे द्रोणांच्या लक्षात आले. त्यांनी प्रेमळपणे एकलव्याला विचारले, 'कोण आहेस तू बाळ? येथे का आलास? काय पाहिजे तुला?'

प्रश्नांची ही फेर ऐकून एकलव्य जरादेखील विचलित झाला नाही. मोजकी पावले टाकीत तो द्रोणाचार्यांजवळ जाऊन पोचला. त्यांच्या पायांवर डोके ठेवून तो म्हणाला, 'गुरुदेव, भिल्लराजा हिरण्यधनूचा मी मुलगा. माझं नाव एकलव्य. मी

धनुर्विद्या शिकण्याच्या हेतूने आपल्याजवळ आलो आहे. आपण मला शिष्य बनविण्याची कृपा करावी, गुरुदेव!'

एकलव्याचे बोलणे पुरे होते न होते तोच सर्व राजकुमार खोखो करून हसले ते आपणालाच हसत आहेत हे एकलव्याच्या लक्षात आले. एकलव्याचा चेहरा रागाने लाल झाला. पण तो काहीच बोलला नाही. त्याने मोठ्या आशेने द्रोणाचार्यांकडे पाहिले. ते अत्यंत गंभीरतेने त्याच्याकडे पाहात होते. त्याला समजावत ते म्हणाले,



'भिल्लकुमारा, मी तुला आपला शिष्य बनवू शकणार नाही. मी फक्त क्षत्रियकुमारांनाच धनुर्विद्या शिकवतो. तू आपल्या घरी परत जावेस हेच बरे!'

द्रोण असे उत्तर देतील ही भीती एकलव्याला वाटत होतीच. पण आपण त्यांचे मन वळवू असा आत्मविश्वास त्याला वाटत होता. अत्यंत मर्मस्पर्शी स्वरात तो म्हणाला, 'धनुर्विद्या शिकेन तर ती आपल्याच जवळ अशी प्रतिज्ञा केली आहे मी. माझी प्रतिज्ञा पूर्ण झाली नाही तर मी घरी परत जाणार नाही. आपण कृपा करून माझा शिष्य म्हणून स्वीकार करावा.' पण द्रोणाचार्यांचादेखील नाइलाज होता. ते एकलव्याची विनंती मान्य करू शकले नाहीत.

जड अंतःकरणाने एकलव्य कुटीबाहेर पडला. काय करावे हे त्याला सुचेना. आपली हार मानायला तो तयार नव्हता. क्षत्रियकुमारांनी याप्रमाणे आपली टिंगल करावी हे त्याला फार लागले. त्यांच्या उपरोधपूर्व हास्याने त्याच्या हृदयावर आघात केला. कधी त्याला आपल्या वडिलांचे शब्द आठवत तर कधी आपली प्रतिज्ञा. कधी उपरोधाने हसणारे राजकुमारांचे चेहरे त्याच्या डोळ्यांपुढून तरळत. त्यांचे स्मरण होताच एकलव्य कळवळून उठला. त्याच्या मुठी आवळल्या गेल्या. मनातल्या मनात त्यानें एक निश्चय केला.

कुटीतून बाहेर आल्यावर एकलव्य घरी गेला नाही. तो जंगलातच राहू लागला. त्याने द्रोणाचार्यांचा एक मातीचा पुतळा बनविला. जवळच त्याने एक कुटी बांधली. तिथे राहून तो एकटाच धनुर्विद्येचा अभ्यास करू लागला. पहाटेपासून मध्यरात्रीपर्यंत वेगवेगळ्या प्रकारे बाण चालविण्याचा अभ्यास तो करू लागला. चंद्रसूर्य आळीपाळीने उगवले आणि मावळले. ऋतू आले आणि गेले. भीषण गरमीने एकलव्य विचलित झाला नाही, वसंत ऋतू त्याला आपल्या ध्येयापासून परावृत्त करू शकला नाही. कठिण अभ्यास व परिश्रम याचे फळ मिळाले. एकलव्य कुशल धनुर्धर झाला.

एके दिवशी एकलव्य आपल्या मातीच्या गुरूसमोर उभा राहून नेम धरत होता. त्याच्या एका हातात धनुष्य होते. दुसऱ्या हाताने त्याने प्रत्यंचा आकर्ण ओढली होती. इतक्यात एक कुत्रे त्याच्याजवळ येऊन भुंकू लागले. त्याच्या आवाजाने एकलव्याचे लक्ष विचलित होऊ लागले. एकलव्याने त्याला हाकून लावण्याचा

खूप प्रयत्न केला पण कुत्रा काही केल्या जाईना. तेव्हा त्याने एक शब्दवेधी बाण मारून त्याचे तोंड बंद केले. बाणांनी तोंड बंद केलेला तो कुत्रा तडफडत तेथून पळाला. तो कुत्रा होता कौरव-पांडव राजकुमारांचा. ते सर्व वनात शिकारीसाठी आले होते. कुत्र्याची अवस्था पाहून ते आश्चर्यचकित झाले. त्यांचा आपल्या डोळ्यावर विश्वास बसेना. कुणी तरी अत्यंत कुशल धनुर्धराने कुत्र्याचे तोंड बंद केले होते. ते आतापर्यंत फक्त अर्जुनालाच काय ते कशल धनुर्धर मानत होते. पण कोणीतरी त्याच्यावरसुद्धा मात केली होती. कुत्र्याला घेऊन ते द्रोणाचार्यांकडे गेले.

कुत्र्याची स्थिती पाहून द्रोणाचार्यदेखील चकित झाले. मनातल्या मनात त्या अज्ञात धनुर्धराची प्रसंशा केल्याविना त्यांना राहावले नाही. त्याने किती कुशलतेने कुत्र्याचे तोंड बंद केले होते. 'चला, हा चमत्कार करणारा धनुर्धर आहे तरी कोण हे तर पाहू.' ते राजकुमारांना म्हणाले. राजकमार गुरू द्रोणाचार्यांबरोबर चालू लागले. थोडे दूर गेल्यावर त्यांना एकलव्य दिसला. द्रोणाचार्यांनी त्याला ओळखले. अत्यंत स्नेहाने त्यांनी विचारले, 'बाळ, फार कुशल धनुर्धर आहेस तू. तुझे गुरू कोण आहेत?'

'आचार्य द्रोणाचार्य माझे गुरू आहेत' एकलव्य अत्यंत नम्रतापूर्वक म्हणाला.

'आचार्य द्रोण?' सर्व राजकुमार व स्वतः द्रोणाचार्य आश्चर्याने उद्गारले.

'होय, आचार्य द्रोण.' मातीच्या प्रतिमेकडे बोट दाखवीत एकलव्य म्हणाला. नंतर त्याने द्रोणाचार्यांना सर्व काही सांगितले. द्रोणाचार्य त्याची निष्ठा पाहून फार प्रसन्न झाले. आजपर्यंत असा दृढ प्रतिज्ञ किशोर त्यांनी पाहिला नव्हता. अशा होतकरू शिष्याला नकार दिल्याबद्दल त्यांना पश्चात्तापही होऊ लागला. त्याक्षणी अर्जुनाला दिलेले वचन त्यांना आठवले. अर्जुनापेक्षा श्रेष्ठ धनुर्धर दुसरा कोणी होणार नाही असे वचन दिले होते. परंतु एकलव्य तर अर्जुनापेक्षा अनेक पटीने श्रेष्ठ दिसत होता. द्रोणाचार्य चिंताग्रस्त झाले. काहीतरी केलेच पाहिजे. अचानक त्यांना एक उपाय सुचला. काहीसा विचार करून ते एकलव्याला म्हणाले, 'बाळा, तू मला गुरू मानलेच आहेस तर मीही तुझा शिष्य म्हणून स्वीकार करतो. पण तुला गुरुदक्षिणा द्यावी लागेल. देशील तू!'

मान तुकवून एकलव्य म्हणाला, 'अवश्य गुरुदेव, आज्ञा द्यावी!'

'तू आपल्या उजव्या हाताचा अंगठा मला दे'. द्रोण तात्काळ म्हणाले.

एक क्षण सर्व स्तब्ध झाले. राजकुमारांचा आपल्या कानांवर विश्वास बसेना. परंतु एकलव्याने मुळीच उशीर लावला नाही. मागेपुढे न पाहता, . ताबडतोब आपला उजवा आंगठा त्याने कापून काढला व आचार्य द्रोणांना नजर केला. त्याची गुरुभक्ती पाहून द्रोणाचार्य सद्गदित झाले. त्यांच्या डोळ्यांत आसवे भरून आली. सावळ्या रंगाच्या त्या भिल्ल कुमाराच्या चेहऱ्यावर एक अपूर्व तेज विलसत होते. द्रोणाचार्यांनी कौरव-पांडव कुमारांकडे पाहिले. सर्वांचे डोळे आश्चर्याने विस्फारले होते. त्यांना वाटत होते हा भिल्ल किशोर त्या सर्वांपेक्षा, गुरू द्रोणाचार्यांपेक्षाही फार फार थोर आहे.





## बाळकृष्ण :

भाद्रपदातील अष्टमीची रात्र होती. घनदाट काळोख पसरला होता. हत्तीच्या झुंडीसारखे काळे मेघ आकाशात जमले होते. ढगांच्या गडगडाटाबरोबर वीज चमकताच भूकंप झाल्याचा भास होई.

मथुरेचे रहिवासी आपापल्या घरात गुडुप झोपले होते. अशा वेळी बाहेर कोण निघणार ? परंतु मथुरेचा राजा कंस जागा होता. बहीण देवकीचे अपत्य त्याची हत्या करील अशी भविष्यवाणी ऐकल्यापासून त्याची तहान-झोप पार हरपली होती. देवकी

आणि तिचा पती वसुदेव यांना त्याने तुरुंगात डांबले होते. देवकीला तुरुंगातच सात मुले झाली. कंसाने त्या सर्वांना जन्मतःच मारून टाकले. कसलाही धोका पत्करण्याची त्याची तयारी नव्हती. आता देवकी आठव्या अपत्यास जन्म देणार होती.

कंस राजा अत्याचारी होता. आपले वडील उग्रसेन यांना बंदिवासात टाकून तो राजा बनला होता. त्याने किती लोकांना ठार मारले, किती लोकांना त्रास दिला याची काही गणतीच नव्हती. प्रजेत हाहाकार माजला होता. त्याचा नाश करणारा त्याच्या बहिणीच्याच उदरी जन्म घेणार आहे हे ऐकून मात्र कंसाच्या काळजीला सीमा उरली नव्हती.

ठीक रात्री बारा वाजता रोहिणी नक्षत्रावर देवकीने कृष्णाला जन्म दिला. हे तिचे आठवे अपत्य होते. या सावळ्या बाळाच्या जन्माबरोबर त्यांच्या कोठडीत अचानक प्रकाश पसरला. हे बालक सामान्य नसून कंसाचा शेवट याच्याच हातून होईल हे वसुदेव देवकीला कळून चुकले. कसेही करून या बालकाचे कंसापासून रक्षण करावयाचे असा निर्धार त्यांनी अगोदरच केला होता. वसुदेवांनी चुपचाप या बालकाला एका टोपलीत झोपवले आणि ते कारागृहाच्या दारांच्या दिशेने निघाले. तुरुंगाची दारे आपोआप उघडली. शिपाई गाढ झोपले होते. चोरपावलांनी वसुदेव बाहेर पडले. त्यांना जातांना कोणीच पाहिले नाही.



वर्षा ऋतूच्या त्या अंधाऱ्या रात्री सारी मथुरा नगरी सुखाने झोपली असता डोक्यावर टोपली घेऊन वसुदेव यमुना तीरी येऊन पोचले. मुसळधार पाऊस पडत होता. अंधार इतका होता की हाताला हात सापडत नव्हता. यमुनेला पूर आला होता. पण नदीजवळ येताच पुराचे पाणी ओसरू लागलेले पाहून वसुदेव चकित झाले. सहज नदी ओलांडून ते गोकुळात जाऊन पोचले.

गोकुळात देखील सर्व चिडीचूप होते. कोणीच जागे नव्हते. वसुदेव आपला मित्र नंद याच्या घरी पोचले तेव्हा त्याची पत्नी यशोदा हिने एका मुलीला जन्म दिला होता. नंदाने चुपचाप बाजेवरील मुलीला उचलून टोपलीत ठेवले व टोपलीतील बालकृष्णास बाजेवर. मग तसेच चोरपावलांनी ते परत फिरले. यमुनेला पाणी चढले नव्हते. जणू ती त्यांचीच प्रतीक्षा करीत होती. नदी ओलांडून वसुदेवांनी मथुरेत पाय ठेवताच पुन्हा नदीला पूर आला.



या चमत्कारामुळे मानातल्या मनात चकित होत वसुदेव कारागृहाजवळ आले. दार अजूनही उघडे पडले होते व पहारेकरी तसेच गाढ झोपले होते. ते आत शिरताच दार आपोआप बंद झाले. या कानाचे त्या कानालादेखील कळले नाही.

देवकीच्या कुशीत शिरताच बालिका रडू लागली. सर्व पहारेकरी खडबडून जागे झाले. देवकीला आठवे अपत्य झाल्याचे कळताच कारागृहात गोंधळ माजला.

कंसाला ही बातमी सांगण्यास काही सैनिक राजवाड्याकडे धावले. त्या वेळी कंस आपल्या शय्यागृहात फेऱ्या मारीत होता. कोणी त्याच्या मारेकऱ्याच्या जन्माची बातमी घेऊन येतो की काय हे पाहाण्याकरता मधूनमधून तो दाराकडे पाहात होता. इतक्यात घाबरलेले सैनिक धापा टाकीत तेथे येऊन म्हणाले, 'महाराज, महाराज देवकीदेवीने मुलीला जन्म दिला आहे.'

हे ऐकताच तलवार उपसून कंस पादत्राणे न घालताच कारागृहाकडे धावला. राजाचे उग्र रूप पाहून तुरुंगाचे पहारेकरी एका बाजूला झाले. दार उघण्यात आले. कंसाने झेप घेऊन देवकीच्या कुशीतील मुलगी ओढून घेतली. तिला तो एका दगडावर आपटणार तोच त्याच्या हातातून निसटून पक्ष्याप्रमाणे ती आकाशात उडून गेली व तेथून म्हणाली, 'पापी कंसा, तुला मारणारा पृथ्वीतलावरच आहे.'

हे ऐकताच कंस रागाने कापू लागला. व्रजभूमीत त्या रात्री जन्मलेल्या सर्व बालकांना ठार करण्याचा हुकूम त्याने सोडला. यासाठी त्याने अनेक लोकांना नेमले. त्यात काही स्त्रियासुद्धा होत्या. त्यांपैकी एकीचे नाव होते पूतना.

कंसाचे मारेकरी व्रजभूमीत फिरून नवजात बालकांची हत्या करू लागले. सर्वत्र हाहाकार उडाला.

पुतनेला वेगवेगळी रूपे घेता येत होती. नित्य नवे रूप धारण करून ती निर्दोष बालकांची हत्या करू लागली.

वेष बदलून ती नंदाकडेही आली. त्यावेळी तेथे बारशाचा समारंभ चालू होता. कुरवाळण्यासाठी म्हणून तिने बाळाला जवळ घेतले व ती त्याला दूध पाजू लागली. पुतनेने आपल्या छातीला जहाल विष लावले होते. तिला वाटले दूध पिताच मूल मरून जाईल. परंतु झाले उलटेच. त्या छोट्या बालकाने इतक्या जोराने तिचे दूध ओढले की पूतना ओरडून खाली कोसळली. आणि तिने तडफडत प्राण सोडला. मरताच तिचे भयंकर सत्य स्वरूप प्रगट झाले.

पुतनेच्या मृत्यूची वार्ता ऐकून कंस बेचैन झाला. त्याचा पुतनेवर फार विश्वास होता. मग त्याने पुतनेचा भाऊ बकासूर याला कृष्णाचा वध करण्यासाठी पाठविले. त्याचीही गती पुतनेसारखीच झाली. तेव्हा त्याचा भाऊ अधासुर यास पाठविण्यात आले. तोही बालकृष्णाच्या हस्ते यमसदनास गेला.

कंस कारस्थाने करीतच राहिला. कृष्णाचा प्राण घेण्यासाठी तो सतत वेगवेगळे प्रयत्न करायचा, पण प्रत्येक वेळी त्याचा डाव निष्फळ होई.

हळू हळू कृष्ण थोडा मोठा झाला. आता तो बासरी वाजवीत गोपाळांसह गाई चरायला जाई. त्यांच्याशी नानाप्रकारचे खेळ खेळे.

यमुनेत कालिया नावाचा विषारी नाग आपल्या परिवारासह राहात होता. त्याच्यामुळे यमुनेचे सर्व पाणी विषारी झाले होते. तिच्या तटावरील हिरवीगार फळझाडं, फुलझाडं सुकून गेली होती. गाईंनी व गोपबालकांनी यमुनेचे विषारी पाणी प्राशन केले तेव्हा त्यांची अवस्था वाईट झाली. हे कृष्णाला कळताच या विषारी नागाला यमुनेबाहेर हाकून देण्याचा निश्चय त्याने केला.

एक दिवस कृष्ण गोपबालकांसह यमुना तटावर चेंडू खेळत असता अचानक चेंडू नदीत पडला. त्याचक्षणी तो काढण्यासाठी कृष्णाने नदीत उडी घेतली. हे पाहून तीरावरील गोपबालक ओरडू लागले. त्यांचे आईवडीलही तेथे गोळा झाले. नंद यशोदेला बातमी लागताच ती दोघे धावत तेथे आली. कृष्ण अजून पाण्याच्या तळाशी आहे हे पाहून त्यांचे प्राण कंठाशी आले. इकडे कालियाने कृष्णास यमुनेच्या

आत पाहताच क्रोधाने फुंकारत तो त्याच्यावर धावून गेला. कृष्ण सावधच होता. नाग जवळ येताच उडी मारून तो त्याच्या फण्यांवर चढला. कालियाला अनेक फणा होत्या. त्यांनी कृष्णाला दंश करण्याचा प्रयत्न तो करू लागला. कृष्णाने चपळाईने आपल्या लहानशा पावलांनी त्याची एकेक फणा ठेचायला सुरुवात केली. नाग तडफडू लागला. तो घाबरून यमुनेच्या बाहेर निघाला.





शेकडो फणा असलेल्या कालियाच्या डोक्यावर बालकृष्ण नाचत होता. मधून मधन आपली छोटी बासरीदेखील वाजवीत होता. हे दृश्य प्रेक्षणीय होते. त्यानंतर कालिया सपरिवार रमणक द्वीपावर गेला. या घटनेनंतर तर सर्वजण कृष्णाचे भक्त झाले. त्याच्या शौर्याची ही कथा 'कालियामर्दन' म्हणून प्रसिद्ध आहे.

कृष्णाचे बालपण अशा अनेक घटनांनी भलेले होते. तो साहसी व निर्भय होता. त्याच्या मुरलीत जादू होती. तिचे स्वर ऐकून गाई चरायच्या विसरत. व्रजातील स्त्रिया आपली कामेधामे सोडून त्याच्याजवळ येऊन बसत. त्यांचे कृष्णावर खूप प्रेम होते. त्या त्याची चेष्टा पण करीत. कधी त्याची मुरली लपवून ठेवीत, तर कधी त्याच्या मस्तकावरील मोरमुकुट अदृश्य करीत. कृष्णही थट्टेचे उत्तर थट्टेनेच देई. कधी तो त्यांचे लोणी चोरून खाई. कधी दह्यादुधाची मडकी फोडी. याप्रमाणे व्रजवासियांचे आयुष्य मोठ्या मजेत चालले होते.

एके दिवशी व्रजात कसल्यातरी उत्सवाची तयारी होत असल्याचे कृष्णाला दिसले. नंदाला विचारता इंद्रपूजेची तयारी सुरू असल्याचे त्यांनी सांगितले. ते म्हणाले,

'बाळ, इंद्र मेघांचा राजा आहे. पाऊस तोच पाडतो. या पावसामुळे शेतात धान्य पिकते. म्हणून आपण दरवर्षी यज्ञ करून इंद्राला हविर्भाग अर्पण करतो.'

हे काही कृष्णाला पटले नाही. तो म्हणाला, 'बाबा, पाऊस पाडणे हे तर मेघांचे कामच आहे. त्यात इंद्राचा काय संबंध! आपण तर इंद्राऐवजी आपल्या गोवर्धन पर्वताची पूजा केली पाहिजे. जेव्हा मेघ पर्वतावर आदळतात तेव्हा पाऊस पडतो. इंद्र कुठला कोण?'

ही गोष्ट सर्वांनाच उचित वाटली. त्यांनी गोवर्धनाची पूजा करण्याचे ठरविले. सर्व गोपबाळ आपापल्या छकड्यांमध्ये बसून गोवर्धनाची पूजा व प्रदक्षिणा करू लागले.

इंद्राला हे कळताच तो भयंकर रागावला. त्याने मुसळधार पाऊस पाडायला सुरुवात केली. इतका पाऊस पडला की, थोड्याच वेळात संपूर्ण व्रज बुडून गेले. लोकांत हाहाकार माजला. सर्व धावत कृष्णापाशी आले. त्याने हसतहसत आपल्या छोट्याशा करंगळीवर संपूर्ण पर्वत उचलून धरला तेव्हा त्यांच्या आश्चर्यास पारावार उरला नाही. सर्व गाव त्या खाली गोळा झाला. याप्रमाणे कृष्णाने पुरापासून त्यांचे रक्षण केले.

सात दिवसपर्यंत कृष्णाने गोवर्धन आपल्या करंगळीवर उचलून धरला होता. शेवटी इंद्राला हार मानावी लागली. त्याचा गर्व चूर झाला. सर्व व्रजवासी कृष्णाचे भक्त बनले. लोक त्याला गोवर्धनधारी म्हणू लागले.

कंस अजूनही कारस्थाने करून कृष्ण व बलरामाच्या हत्येचे प्रयत्न करीत होताच. त्याने अरिष्टासुर, केशी आणि व्योमासुर नावाच्या दैत्यांना त्यांची हत्या करण्यासाठी पाठविले. पण त्या सर्वांना कृष्ण व बलरामाने यमसदनास पाठविले.

कृष्ण व बलरामाला व्रजात ठार मारणे कठीण आहे हे पाहाताच त्याने एक डाव

रचला. मथुरेत एका विशाल उत्सवाचे आयोजन करून त्याने त्यासाठी कृष्ण व बलरामाला आमंत्रित केले.

आमंत्रण मिळताच ताबडतोब कृष्ण मथुरेला जाण्यासाठी तयार झाला. ते दोघे मथुरेला जाणार हे ऐकून व्रजवासियांना फार दुःख झाले. परंतु कंसाच्या अत्याचाराचा शेवट करण्याचे महान उद्दिष्ट कृष्णापुढे होते, व ते मथुरेला गेल्याबाचून पार पडणे



शक्य नव्हते. म्हणून सर्व गोपबालक व गोपगोपींना समजावून तो नंद, बलराम व इतर गोपांसह मथुरेस जायला निघाला, व्रजातील सर्व लोक कृष्णाला निरोप देण्यास जमले. त्यांच्या डोळ्यांना धार लागली होती. गोपींनी तर खाणेपिणे सोडले. व्रजात हास्यविनोद आणि रासक्रीडा यांची धामधूम असायची, परंतु आता सर्वत्र औदासिन्य पसरले होते.

श्रीकृष्ण मथुरेस पोचला तेव्हा त्याला पाहण्याकरता रस्तोरस्ती गर्दी दाटली. मथुरेच्या लोकांनी त्याच्या शौर्याविषयी ऐकले होतेच.

वाटेत कृष्णाला चंदन घेऊन चाललेली वाकड्या अंगाची एक बाई भेटली. तिला थांबवून ती कोण आहे, कुठे जात आहे हे कृष्णाने विचारले.

ती म्हणाली, 'माझे नाव त्रिवला आहे. परंतु माझे अंग वाकडे आहे म्हणून लोक मला कुब्जा म्हणतात.' मी कंस महाराजांकरता चंदन घेऊन चालले आहे.'

कृष्ण म्हणाला, 'कुब्जे, हे चंदन आम्हालाच लावून दे.'

कुब्जा खूप हासरी होती. तिला वाटले असे केले तर खूप गंमत येईल. तिने सर्व चंदन कृष्णाच्या शरीराला लावले. सर्वत्र त्याचा सुगंध पसरला. कृष्णाने कुब्जेला बक्षीस देण्याचे ठरविले. त्याने आपल्या पायाने तिच्या पायांच्या नसांना एक झटका दिला. झटका बसताच तिचे वक्र शरीर सरळ झाले. क्षणार्धात कुब्जा अत्यंत सुंदर झाली. कृष्णाने कुब्जेला नवे रूप दिल्याची वार्ता ताबडतोब मथुरेत पसरली. हे ऐकून लोक चकित झाले.

आश्चर्यचकित कुब्जेला तेथेच सोडून कृष्ण गोपबाळांसह धनुष्य यज्ञ चालला होता त्या स्थळी गेला. पहारेकऱ्यांनी व सैनिकांनी त्याला रोखण्याचा प्रयत्न केला पण पाहाता पाहाता कृष्णाने धनुष्याचे तुकडे तुकडे केले व तेथे असलेल्या असुरांचा संहार केला.

या सर्व गोष्टी कंसाच्या कानावर गेल्या. तो मनात खचून गेला होता पण त्याचा आपल्या पहिल-वानांवर भरवसा होता. आपल्या हत्तींसारख्या बलदंड पहिलवानांपुढे कृष्ण, बलराम टिकू शकणार नाहीत याची त्याला खात्री होती. याप्रमाणे मनाला समजावत तो झोपायचा प्रयत्न करू लागला परंतु त्याला रात्रभर झोप आली



नाही. आपण काळ्या तोंडाने गाढवावर बसलो असून राज्याबाहेर जात असल्याचे त्याने स्वप्नात पाहिले. या भयंकर अपशकुनी स्वप्नाने कंस घाबरा झाला. दुसऱ्या दिवशी भयभीत अंतःकरणाने तो उत्सवात सामील झाला.

या कुस्त्यांमध्ये भाग घेण्यासाठी दूरदुरून पहिलवान आले होते. उत्सवस्थळी प्रवेश-द्वाराजवळ त्याने कुवलयापीड नावाचा हत्ती बांधून ठेवला होता. हा हत्ती अत्यंत हिंस्र होता. कृष्ण, बलरामाला पाहाताच त्यांना कुवलयापीडाद्वारे तुडवून टाकण्याचा आदेश माहुताला दिलेला होता. दोघे बंधू आपल्या मित्रांबरोबर तेथे येताच माहुताचा इशारा झाल्यावर हत्तीने त्यांना तुडविण्याचा प्रयत्न केला, पण यात त्याचीच दुर्गती झाली.





सुरुवातीला श्रीकृष्णाने त्याला हुलकावण्या दिल्या. मग त्याची सोंड पकडून असा झटका दिला की तो किंचाळत जमिनीवर गडबडा लोळू लागला. थोड्याच वेळात तो मरून पडला.

आत पहिलवानांना उत्साह येण्यासाठी वाद्ये वाजविण्यात येत होती. कृष्ण बलरामाबरोबर आत शिरला तेव्हा कंसाच्या डोळ्यात भीती दिसू लागली. इतक्यात चाणूराने श्रीकृष्णाला व मुष्टिकाने बलरामाला मल्लयुद्धाचे आव्हान दिले. हे दोन्ही भाऊ मागे थोडेच सरणार होते. मांड्या ठोकू त्यांनी देखील आखाड्यात उड्या मारल्या. अगोदर तर त्यांचे साहस पाहून लोकांना हसूच आले. ही छोटी बाळं या पहिलवानांशी कसा सामना देणार !

स्त्रियांना तर मुलांची दया आली व त्या कंसाची निंदा करू लागल्या. आखाड्यात श्रीकृष्ण व बलराम आपल्या भीमकाय प्रतिस्पर्ध्यांना चीत करण्यात गुंतले होते.

पुष्कळ वेळ झाला तेव्हा कृष्णाने चाणूराला ठार मारण्याचा निश्चय केला. त्याने त्याला जोराने बुक्की मारली. त्याबरोबर चाणूर किंचाळत जमिनीवर कोसळला. तिकडे बलरामाने मुष्टिकाला ठार मारले.

त्यानंतर कंसाने कूट, शलय, तोशल या मल्लांना मल्लयुद्धासाठी पाठविले. पण त्यांचीही तीच गत झाली. आता तर कंस अगदी घाबरून गेला. शेवटचा उपाय म्हणून त्याचा हात तलवारीवर गेला. कृष्णाला त्याचा डाव कळून चुकला. विद्युतवेगाने उडी घेऊन तो सिंहासनाजवळ पोचला. कंसाचे केस ओढून त्याला खाली ओढले व त्याच्या छातीवर बसून गुद्यांचा वर्षाव सुरू केला. थोड्याच वेळात कंस ठार झाला. कंसाचा संहार केल्यानंतर कृष्णाने त्याचे वडील व आपले आजोबा उग्रसेन यांना राजसिंहसनावर बसविले. तो वासुदेव देवकीला भेटला.

संपूर्ण राज्यात आनंदोत्सव साजरा करण्यात आला. कृष्णाचे मथुरेतील काम संपले होते. काही दिवस मथुरेत घालवल्यानंतर तो बलरामाबरोबर अवंतीपुराकडे (उज्जैन) रवाना झाला. व तेथे सांदीपनी मुनींच्या आश्रमात राहून विद्याभ्यास करू लागला.





## चक्रव्यूहात सापडलेला एकाकी योद्धा :

भारतीय युद्धाचा बारावा दिवस!

आज लढाईत अर्जुनाने शकुनीला जखमी केले होते. त्याचे दोन्ही बंधू वृषक आणि अचल मारले गेले होते. अर्जुनाच्या युद्धकौशल्यापुढे द्रोणाचार्यासारख्या योद्धयाचेदेखील काही चालले नव्हते. त्यामुळे कौरवांच्या सेनेत उदासीनता व काळजी पसरली होती तर पांडवांच्या शिबिरात उत्साह आणि आनंद!

या पराभवामुळे दुर्योधन संतापाने वेडा झाला. तो पूज्य गुरुजनांनासुद्धा अद्वातद्वा बोलू लागला. अर्जुनाबद्दल प्रेम असल्यामुळे सर्वशक्तीनिशी युद्ध न करण्याचा आरोप सर्व सैनिकांसमोर त्याने द्रोणाचार्यांवर केला. ते पांडवांचे पक्षपाती आहेत असे देखील तो म्हणाला.

या अपमानामुळे द्रोणाचार्य विव्हल झाले. दुःखी स्वरात ते म्हणाले, 'दुर्योधना, मी सर्वशक्तीनिशी पांडवांशी युद्ध करीत आहे, तरीही तुला माझा संशय येतो आहेच ना! मी तुला अगोदरच सांगितले होते आणि आताही सांगत आहे की काहीही करून अर्जुनाला तुम्ही पांडवापासून वेगळे करा. मग मी त्यांना एका दिवसात पराभूत करीन. जोपर्यंत अर्जुन पांडवांच्या बरोबर आहे तोपर्यंत त्यांना हरवणे शक्य नाही.'

द्रोणाचार्यांचे बोलणे ऐकून दुर्योधन दुसऱ्या दिवसाच्या युद्धाची योजना आखू लागला.

तेरावा दिवस उजाडला!

दोन्ही पक्षांचे सैनिक शस्त्रास्त्रे सावरून युद्धाच्या तयारीला लागले. लढत लढत अर्जुन दक्षिणेकडे गेला. तो तेथून गेल्याबरोबर द्रोणांनी संधी साधून आपल्या सैन्याचा चक्रव्यूह रचला. नंतर इतर वीरांबरोबर त्यांनी पांडवसेनेवर हल्ला चढविला





पांडवसेनेने आचार्यांना तोंड दिले. परंतु द्रोणाचार्यांशी सामना करणे म्हणजे काही खेळ नव्हता. चक्रव्यूहाचा भेद करून त्यात प्रवेश करणे त्यांच्यापैकी कोणालाच येत नव्हते. आपल्या पक्षाची हार होताना पाहून युधिष्ठिर चिंताग्रस्त झाले. अर्जुन तेथे नव्हता आणि इतर कोणालाच चक्रव्यूह कसा भेदायचा हे ठाऊक नव्हते.

इतक्यात त्यांना अभिमन्यूचे स्मरण झाले. त्याक्षणीच त्यांनी अभिमन्यूला बोलावले. अभिमन्यू अर्जुनाचा पुत्र होता. त्याचे वय केवळ सोळा वर्षांचे होते. परंतु आपल्या पित्याप्रमाणे तो देखील वीर व साहसी होता. कौरवांनादेखील त्या किशोराचे भय वाटत असे. युधिष्ठिराची आज्ञा होताच अभिमन्यू तात्काळ तेथे उपस्थित झाला. येताच त्याने युधिष्ठिराला प्रणाम केला. त्याच्या मुखावर विलसत असलेले अपूर्व तेज पाहून युधिष्ठिराची काळजी दूर झाली. आपल्या काळजीचे कारण सांगून ते म्हणाले चक्रव्यूहात प्रवेश करता न आल्यामुळे कितीतरी योद्धे मृत्युमुखी पडले आहेत. जर परिस्थिती अशीच राहिली तर पांडवांची हार होण्यास मुळीच वेळ लागणार नाही.

अभिमन्यू म्हणाला, 'महाराज, आपण काही काळजी करू नका. मी चक्रव्यूहात एकट्यानेच प्रवेश करून कौरवांची सेना छिन्नविच्छिन्न करून टाकीन. तो पुढे म्हणाला, 'पण महाराज चक्रव्यूहाचा भेद तर मी करू शकेन पण त्यातून बाहेर पडण्याची विद्या मात्र मला माहित नाही.'

त्याने सांगितले की सुभद्रा आईच्या गर्भात तो असताना एक दिवस त्याचे वडील अर्जुन तिला व्यूहात प्रवेश करण्याचे रहस्य सांगत होते. पण ते सांगून होताच तिला झोप आली. अर्जुनाने पुढे काही सांगितले नाही. आपल्या मातेच्या गर्भातून हे ऐकून



अभिमन्यूला व्यूहात प्रवेश करण्याचे रहस्य तर माहीत झाले होते पण बाहेर पडण्याचा उपाय मात्र तो जाणू शकला नव्हता.

त्याची गोष्ट ऐकून युधिष्ठिर फार प्रसन्न झाले. ते म्हणाले, 'बाळा तू एकदा चक्रव्यूह भेदून त्यात प्रवेश तेवढा कर. नंतर आम्हीही तुझ्यामागोमाग येतो.' भीमसेन वगैरेंनीही त्याला दुजोरा दिला.

युधिष्ठिराचा आशीर्वाद घेऊन अभिमन्यू रथात बसला व तो वेगाने कौरवसेनेकडे जाऊ लागला. त्याला येताना पाहून कौरवसेनेत हाहाकार माजला. 'अभिमन्यू आला' म्हणून ते ओरडू लागले. असे वाटत होते जणू सिंहशावक हत्तीच्या कळपावर आक्रमण करण्यासाठी झेपावला आहे.

धाडधाड करीत अभिमन्यू चक्रव्यूहाजवळ येऊन ठेपला. विद्युतवेगाने त्याने आक्रमण केले. थोड्याच वेळात चक्रव्यूहाचे मुख त्याने भेदले. तो इतक्या वेगाने चक्रव्यूह भेदून आत शिरला की पांडवसेनेचे सर्व योद्धे त्यास साथ देऊ शकले नाहीत. एकटा अभिमन्यू चक्रव्यूहात शिरला. आपल्या शौर्याने त्याने कौरवांना दे माय धरणी ठाय करून सोडले. भाजीपाल्याप्रमाणे कौरवसैन्याला चिरत तो पुढे सरकत गेला. समोर आलेल्याला भस्मसात करणाऱ्या अग्निज्वालेसारखा तो भासत होता.

आपल्या सेनेची दुर्दशा दुर्योधनाला पाहवली नाही. तो एकटाच अभिमन्यूशी युद्ध करण्यासाठी धावून गेला. द्रोणाचार्यांनी इतर योद्धयांनाही त्याच्या सहाय्यार्थ

पाठविले. तोपर्यंत अभिमन्यूने दुर्योधनाची स्थिती वाईट करून टाकली होती. कौरव योद्धे मोठ्या कष्टाने त्याचे प्राण वाचवू शकले.

दुर्योधनाची दुर्दशा पाहून कौरवांनी चलाखी केली. त्याकाळी धर्मयुद्ध होत असे. रणांगणात सुद्धा अनीती होत नसे. एक एकटा योद्धा दुसऱ्या एकट्या योद्ध्याशी लढत असे. कौरवांनी नीती गुंडाळून ठेवली. त्यांनी सर्व मिळून एकाकी बालकावर चढाई केली. तरी अभिमन्यू विचलित झाला नाही. शौर्याने तो सर्वांना तोंड देऊ लागला.

अभिमन्यूचे युद्धकौशल्य पाहून द्रोणाचार्य सद्गदित झाले. ते कौरव योध्द्यांना म्हणाले, 'खरोखर, युध्दात अभिमन्यूची बरोबरी करणारा कोणी वीर नाही,' हे ऐकताच दुर्योधन चिडून म्हणाला, 'गुरुदेव, अर्जुनावर आपले प्रेम आहे म्हणून आपण असे म्हणत आहात. नाहीतर या बालकात काय दम आहे? जेमतेम सोळा वर्षाचा पोर! त्याला मुठीत चिरडून टाकता येईल.' थोड्या वेळापूर्वी तो स्वतःच संकटात सापडला होता हे दुर्योधन विसरून गेला होता. दुर्योधनाचा भाऊ दुःशासन याने त्याला पुष्टी दिली. तो म्हणाला 'मी आताच्या आता जाऊन त्याला यमसद-नाला पाठवितो.' असे म्हणून तो अभिमन्यूवर तुटून पडला. परंतु अभिमन्यूच्या शौर्याने त्याचा अहंकार गळून पडला. थोड्याच वेळात दुःशासन जखमी होऊन आपल्या रथात पडला. त्याला मूर्च्छित होताना पाहून कौरवपक्षात शोक पसरला. पांडवांच्या सैनिकांनी अभिमन्यूचा जयजयकार करून आकाश दणाणून टाकले.

हे पाहून कर्ण संतापून गेला. आपले धनुष्य घेऊन तो अभिमन्यूवर चालून गेला. अभिमन्यूने कर्णाबरोबर शौर्याने युद्ध केले. बाणांचा वर्षाव करून त्याने कर्णाला विंधून टाकले. इतर कौरव सैनिकांनासुद्धा त्याने क्षतविक्षत केले. यामुळे सर्व कौरव-सेना विस्कळित होऊन पळू लागली. सोळा वर्षाच्या किशोर अभिमन्यूने एकट्यानेच कौरवसैन्याची दाणदाण उडवून दिली. त्याला हरवणे कौरवांना कठिण वाटू लागले. द्रोणाचार्यांचे स्वप्नदेखील भंग होत होते. अर्जुनाला तेथून दूर नेण्याची त्यांची युक्ती देखील निष्फळ ठरली होती. अभिमन्यूने सर्व कौरवसैन्याच्या वीरांना खाली पाहायला लावले होते. हे पाहून दुःशासनाचा पुत्र लक्ष्मण याला राहावले नाही.

तो देखील अजून बाळच होता. तो हातात गदा घेऊन निघाला. त्यामुळे कौरव-सेनेत देखील उत्साह संचरला. पळणारे सैनिक थांबले व ते पुन्हा युद्धाला तयार झाले. अभिमन्यू व लक्ष्मण या दोन्ही बालकांची झुंझ सुरू झाली. लक्ष्मणदेखील शौर्याने लढला पण अभिमन्यूसमोर तो टिकू शकला नाही. तो जखमी होऊन कोसळला. काही वेळा नंतर तो मृत्यू पावला. पुत्राच्या मृत्यूने दु:शासन वेडा झाला. दुर्योधनाच्या क्रोधाला तर सीमाच राहिली नाही. आपल्या अन्य योद्धयांना बोलावीत तो एकाकी अभिमन्यूवर तुटून पडला. तेव्हा द्रोणाचार्य कर्णाला म्हणाले, 'अभि-मन्यूला अशा प्रकारे पराभूत करणे शक्य नाही. तू मागून जाऊन त्याच्या धनुष्याची दोरी काप. मी इतर योद्धयांच्या साह्याने त्याच्या रथाचे घोडे व सारथी यांना ठार करण्याचा प्रयत्न करतो.' कर्णाने द्रोणाचार्यांच्या आज्ञेचे पालन केले. त्याने चपळा-ईने मागून जाऊन अभिमन्यूच्या धनुष्याची दोरी कापली. तिकडे महारथींनी बाण मारून त्याचे घोडे व सारथी यांना यमसदनास पाठविले. तरीही अभिमन्यू घाबरला नाही. ढाल, तलवार घेऊन त्याने रणक्षेत्रात उडी मारली. विद्युतवेगाने तलवार फिरवीत अभिमन्यू जेथे संचार करी तेथे मैदान मोकळे होई.

द्रोणाचार्य पुन्हा चिंतामग्न झाले. एवढेसे बालक इतके प्रयत्न करूनही त्यांच्या आटोक्यात येत नव्हते. कौरवांकरताही ही लज्जास्पद गोष्ट होती. द्रोणाचार्यांनी कर्णाला बोलावून एक युक्ती सांगितली. त्यानुसार दोन्ही महारथींनी अभिमन्यूची ढाल व तलवार मोडून टाकली.

तलवार तुटल्यावर अभिमन्यू क्षणभर थांबला. पण लगेच त्याला एक उपाय सुचला. त्याने रथाचे तुटलेले चाक उचलून घेतले. जखमी सिंहाप्रमाणे तो शत्रूवर तुटून पडला. अभिमन्यूचे हे शौर्य पाहून कौरवसेना चकित होऊन गेली. नि:शस्त्र असून देखील तो सर्वांचा काळ भासत होता. कौरवसेनेची हिंमत खचताना पाहून दु:शा-सनाच्या दुसऱ्या पुत्राने गदा उचलली व तो अभिमन्यूवर धावून गेला. त्याला येताना पाहून अभिमन्यूने रथाचे तुटलेले चाक फेकून देऊन गदा हाती घेतली.

दोन्ही योद्धयांमध्ये भीषण युद्ध सुरू झाले. लढता लढता दोन्ही वीर भूमीवर कोसळले. दोघांनीही ताबडतोब स्वत:ला सावरण्याचा प्रयत्न केला.

एकटा अभिमन्यू युद्ध करता करता थकून गेला होता. त्याला उठायला एक क्षणाचा विलंब लागला. हा एक क्षणाचा विलंब त्याला प्राणघातक ठरला. संधी साधून दुःशासनाच्या पुत्राने अभिमन्यूवर गदेचा प्रहार केला. त्याक्षणी त्याचे प्राणपाखरु उडून गेले.

अभिमन्यूच्या मृत्यूने कौरवसेनेत तर आनंद पसरला पण कर्ण व द्रोण यांना रडू आले. धृतराष्ट्राचा एक पुत्र युयुत्सु याला तर हा अधर्म सहन झाला नाही. तो म्हणाला, 'तुम्ही हे चांगले केले नाही. एकाकी बालकाला मारून तुम्ही कोणते शौर्य दाखविले? तुम्हाला लाज वाटली पाहिजे. धिक्कार असो तुमचा!' एवढे बोलून युयुत्सुने आपली शस्त्रास्त्रे फेकून दिली आणि तो रणक्षेत्रातून निघून गेला.

अभिमन्यू अधर्माने मारला गेला, पण मरूनदेखील तो अमर झाला।





# पराक्रमाचा सूर्य

एक हिरवेगार वन होते. त्यात एक छोटीशी कुटी होती. कुटीसमोर काही बालके खेळत होती. त्यात काही मुनीकुमार होते तर काही गिरिजनांची मुले. त्यात धनुष्यबाण घेतलेली दोन सुंदर बालके देखील होती. ती सर्व एकत्र खेळत होती. अचानक दूर धूळ उडताना दिसू लागली. मुलांचा खेळ थांबला. एक मुलगा भीतभीत म्हणाला, 'पळा, पळा, कोणाचे तरी सैन्य येत आहे.' परंतु खेळात रंगलेल्या मुलांनी त्याच्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. ती खेळतच राहिली.

थोड्या वेळाने श्यामल रंगाचा एक सुंदर घोडा धावत त्याच्यापाशी येऊन उभा राहिला. घोड्याच्या मस्तकावर सोन्याची पट्टी होती. तीवर पुढील शब्द लिहीले होते, 'अयोध्येचे चक्रवर्ती सम्राट, महाराज श्री रामचंद्र यांचा हा अश्व आहे. महापराक्रमी शत्रुघ्न या अश्वाचे रक्षण करीत आहेत. ज्या देशातून हा अश्व जाईल तो जिंकला गेला असे मानले जाईल. ज्याला अयोध्येच्या महाराजांना आपला सम्राट मानायचे नसेल त्याने हा अश्व पकडावा आणि त्याच्या मागे येणाऱ्या सैन्याशी युद्ध करावे.'

स्वर्णपट्टिकेवर अंकित हे वाक्य वाचून एका बालकाला हसू आले. आपला धनुष्यबाण उचलत तो म्हणाला, 'मित्रांनो, हा अश्व आपल्या या वनालादेखील अयोध्येच्या महाराजाची संपत्ती बनवायला आला आहे. पण आम्ही इथे असताना असे

होऊ देणार नाही. हा आमच्या क्षत्रियत्वाचा अपमान आहे. त्याला आव्हान आहे.' हे बोलला होता लव.

हा अश्व आपला पिता रामचंद्र यांचा आहे व आपल्या अश्वमेधयज्ञाची सांगता करण्याकरता त्यांनीच तो सोडला होता हे लवाला माहीत नव्हते. त्या अनभिज्ञ बालकाने आपल्या धनुष्याला बाण चढविला आणि पुढे होऊन अश्वाचा लगाम धरला. खेळता खेळता त्याने अश्वाला झाडाशी बांधून टाकले. त्याच क्षणी अश्वाचे रक्षण करणारे सैनिक येऊन पोचले. अश्वाला वृक्षाला बांधलेले पाहून ते त्याला सोडविण्यासाठी पुढे झाले. त्यांना वाटले की एखाद्या बालकाने खेळता खेळता त्याला बांधले असावे. परंतु ते काही पावलं पुढे जातात तोच लवाने आपल्या बाणांनी काही सैनिकांना जखमी केले. सैनिक दचकून जागच्या जागी थांबले. क्रुद्ध होऊन ते लवाकडे पाहू लागले. त्यांना आपल्याकडे रोखून पाहाताना पाहून लव गंभीरपणे म्हणाला, 'या अश्वाला मी बांधले आहे. जो सैनिक त्याला सोडायचा प्रयत्न करील त्याला आपले प्राण गमावावे लागतील.' लवाचे हे उग्र रूप पाहून सैनिक घाबरले, ते लगेच आपल्या सेनानायकाकडे गेले. त्यांचा सेनानायक शत्रुघ्न होता. त्याने तावडतोब आपला मुख्य सेनापती कालजित याला युद्ध करण्यास पाठविले. कालजिताने सैन्याचा व्यूह रचला. तो स्वतः लवाशी युद्ध करण्यास समोर आला. पण प्रथम त्याने लवाला प्रेमाने समजावण्याचा प्रयत्न केला. परंतु लव ऐकेना. आता कालजिताला युद्ध करण्याशिवाय उपाय नव्हता. आपल्या सैनिकांना ललकारत तो पुढे आला. कालजित काही थोडी पावले समोर आला न आला तोच लवाने त्याला आपल्या बाणांनी वेधून टाकले. नंतर त्याने त्याच्या सैनिकांवर बाणांचा पाऊस पाडला. सैनिक जखमी होऊन पळू लागले. हे पाहून जखमी कालजिताने तलवार उपसली व लवाला आव्हान दिले. लवाने हसून भात्यातून बाण काढला व नेम साधून कालजितावर सोडला. बाण सरळ कालजिताच्या काळजास जाऊन लागला. जमिनीवर पडून तो तडफडू लागला. थोड्या वेळात तो मृत्यू पावला. सैनिकांनी धावत जाऊन शत्रुघ्नाला हे दुःखद वृत्त सांगितले. बातमी ऐकून ते चिंताग्रस्त झाले. मग हनुमान, अंगद, सुग्रीव वगैरेसह ते स्वतः रणभूमीवर आले.



वीर वेषातील बालक लवाला पाहून क्षणभर शत्रुघ्न स्तंभित झाले. त्याचा पराक्रम पाहून त्यांचे मन सद्‌गदित झाले. पण दुसऱ्याच क्षणी युद्धभूमीवर भावनांना स्थान नसते



याचे स्मरण त्यांना झाले. तात्काळ त्यांनी आपला सेनापती पुष्कल यास युद्ध करावयास पाठविले. पुष्कल शूरवीर होता, पण लवापुढे त्याला देखील पराजित व्हावे लागले. मग मात्र हनुमानाला राहावले नाही. वनातील एक विशाल वृक्ष उपटून भयंकर गर्जना करीत तो लवावर धावून गेला. तो छोटासा बालक सावध होताच. त्याने हनुमानावर

बाण सोडले. त्याच्या बाणांनी हनुमानाच्या हातातील वृक्षाचे तुकडे-तुकडे झाले. हे पाहून हनुमानाने आपली शेपटी लांब केली. त्याने लवाला आपल्या शेपटीला गुंडाळले. या संकटातदेखील लव घाबरला नाही. त्याने उडी मारून हनुमानाच्या छातीवर एक बुक्का मारला. तो आघात हनुमानाला सहन झाला नाही आणि तो बेशुद्ध झाला.

हनुमान बेशुद्ध पडलेला पाहून शत्रुघ्न चिंतीत झाले. एका बालकाच्या शौर्याने त्यांना थक्क करून टाकले. एका साधारण मुलात एवढे कौशल्य आले तरी कुठून ? त्यांना आश्चर्य वाटत होते. शत्रुघ्नाला रणसज्ज झालेला पाहून लव हासला. त्याने त्याच्यावर बाणांचा तीव्र वर्षाव केला. क्षणभरात शत्रुघ्नसुद्धा बेशुद्ध झाला. हे पाहून रामाच्या सैन्यात खळबळ उडाली. सर्व योद्धे एकदम लवावर तुटून पडले. तरी देखील लव धैर्याने सर्वांना तोंड देत राहिला. तेवढ्यात शत्रुघ्नांना शुद्ध आली. त्यांनी रामाने दिलेला एक खास बाण धनुष्याला लावून लवावर सोडला. बाण सरळ लवाच्या हृदयाला जाऊन लागला. तत्क्षणी तो मूर्च्छित होऊन पडला. काही मुनिकुमार वृक्षावर बसून हे युद्ध पाहात होते. त्यांना मोठी गंमत वाटत होती. पण जेव्हा त्यांनी लवाला मूर्च्छित झालेले पाहिले तेव्हा त्यांनी आश्रमाकडे धाव घेतली.

हा वाल्मिक महर्षींचा आश्रम होता. त्यावेळी सीता काही काम करीत होती. कुश कुटीजवळ खेळत होता. मुलांनी सीता व कुश यांना सर्व हकिगत सांगितली. लव मूर्छित झाला आहे हे ऐकून सीतेच्या डोळ्यात पाणी आले. हे पाहून कुश म्हणाला, ‘आई, तू अशी अश्रु गाळू नकोस. मी आता जाऊन लवाचे कुशलक्षेम पाहून येतो.’ सीतेच्या चरणाला स्पर्श करून कुश लगेच युद्धभूमीकडे धावला.



तोपर्यंत लव शुद्धीवर आला होता. कुशाला येताना पाहून त्याने रथाखाली

उडी घेतली. कुशाने अगोदर लवाला छातीशी धरले. मग दोन्ही भाऊ धनुष्यावर बाण चढवून लढायला तयार झाले. शत्रुघ्नाने सैन्याला युद्धासाठी पूर्णतः सुसज्ज राहाण्याचा आदेश दिला. मग काय? एवढी मोठी सेना दोन्ही बालकांवर तुटून पडली. हनुमानही शुद्धीवर आला होता. एक विशाल शिळा उचलून तो दोन्ही भावांवर चाल करून गेला. बरोबर अंगदही आला. लव आणि कुशांनी गुडघे टेकवून बाणाचा मारा केला. शेवटी हनुमान व अंगद बेशुद्ध होऊन पडले. हळूहळू इतर योध्द्यांचीही तीच अवस्था झाली. थोड्याच वेळात दोन्ही भावांनी शत्रुघ्नाच्या सेनेतील सर्व वीर योद्ध्यांना धारातीर्थी लोळविले. कुशाच्या बाणांनी शत्रुघ्नसुद्धा बेशुद्ध होऊन पडले.

सर्वांना मूर्च्छित पडलेले पाहून दोन्ही भाऊ खूप खुश झाले. त्यांनी वृक्षाला बांधलेल्या अश्वाकडे पाहिले आणि ते घरी जायला निघाले. इतक्यात विजयाची स्मृती म्हणून काही खूण घेऊन जाणे आवश्यक आहे हे त्यांच्या लक्षात आले. त्यांनी शत्रुघ्नाच्या मुगुटातील एक बहुमूल्य मणी काढून घेतला व हनुमान व सुग्रीवाची शेपटी धरून त्यांना फरफटत आश्रमात घेऊन आले. आपल्या मुलांना दोन वानरांसह येतांना पाहून सीतेला हसू आले. जवळ येताच तिने हनुमानला व सुग्रीवाला ओळखले. ती आपल्या दोन्ही मुलांना रागे भरली आणि हनुमान व सुग्रीवाचा परिचय करून दिला.

हा अश्व रामाचा आहे हे सीतेचा लक्षात आले. ती लवांकुशाला म्हणाली, 'बाळांनो, हा अश्व तुमच्या पित्याचा आहे. जा त्याला लवकर मोकळे सोडा.'

आपल्या पित्याचे नाव ऐकून लव, कुश प्रसन्न झाले. ते म्हणाले, 'आई, आम्ही क्षत्रिय धर्माचे पालन केले.' यावर सीता निरुत्तर झाली. तिला वाटले रामचंद्रांना हे कळले तर त्यांना काय वाटेल! तिने आपल्या पुण्यबलाने रणात पडलेल्या सर्व मृत लोकांना जिवंत केले. तोपर्यंत शत्रुघ्नांना शुद्ध आली होती. ते चुपचाप अयोध्येस परतले. त्यांच्याबरोवर शामवर्णी अश्वही परत गेला.

त्या काळी अश्व सकुशल परत आल्यावर यज्ञ होत असे. याला राजसूय यज्ञ म्हणत. या यज्ञात भाग घ्यायला महर्षी वाल्मिकींनादेखील आमंत्रण आले. ते लव, कुश या दोन भावंडांना आपल्याबरोबर घेऊन निघाले. वाल्मिकीच्या आश्रमात

ते दोघे रामायण गात. सर्व रामायण त्यांना कंठस्थ होते. त्यांचे आवाज देखील मधुर होते. दोन्ही बंधू अयोध्येच्या रस्त्यात रामायण ऐकवू लागले. त्यांची रामायण सांगण्याची पद्धत इतकी चांगली होती की ऐकणारांची गर्दी त्यांच्याभोवती गोळा होई.

एके दिवशी ते दोघे राजवाड्यासमोरून रामायण गात गात जात होते. त्यांच्या मधुर कंठातून स्रवणारे गायन ऐकून राम मुग्ध झाले. त्यांनी दोन्ही भावांना बोलावले. त्यांनी राजवाड्यात बसून रामायण ऐकले. दोन्ही मुले सुंदर होती, सुसंस्कृत होती. त्यांच्या मुखाने रामायण ऐकून राम सद्‌गदित झाले. त्यांनी मुलांना बक्षिस देऊ केले पण त्यांनी एकही मुद्रा घेतली नाही. ते रामाला म्हणाले, 'महाराज, जर आपण खरोखर आमच्यावर प्रसन्न झाला असाल तर आपल्या सर्व प्रजेसह आपण आमचे रामायण ऐकावे. आमचे बक्षिस हेच आहे!' रामाने त्यांची गोष्ट मान्य केली. यज्ञाच्या उरलेल्या वेळात लवकुशांनी जेव्हा रामायण गाऊन दाखविले तेव्हा लोकांच्या डोळ्यात अश्रू आले.

सर्वांनी त्यांची खूप प्रशंसा केली. रामायण ऐकता ऐकता रामाला सीतेचे स्मरण झाले. तेव्हा महर्षि वाल्मिकीने वस्तुस्थिती प्रगट केली. ही दोन्ही बालके सीतेचीच आहेत हे त्यांनी रामाला सांगितले. हे ऐकून रामाने धावत जाऊन त्यांना आपल्या छातीशी धरले. त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. आपले पुत्र आपल्यासारखेच वीर आणि साहसी आहेत म्हणून देखील राम प्रसन्न होते. त्यांच्यामुळेच सीतेचा वनवास संपला. रामाने तिला परत बोलावले. पण त्या काळची परिस्थिती फार विचित्र होती. राजाला सर्व प्रजेचे मन सांभाळावे लागे. जनता आपल्यावर टीका करीत असल्याचे रामाने ऐकले. सीता पवित्र आहे यावर जनतेचा विश्वास नव्हता. जेव्हा सीता पवित्र असल्याचे प्रमाण द्यावे लागले. सीता सरळ भूमीत गडप झाली.

लव व कुश दोघेही हे पाहातच राहिले. ते काही करू शकले नाहीत. दोन्ही भाऊ अभागी होते. जेव्हा त्यांचा जन्म झाला तेव्हा त्यांना आपल्या पित्याची माहिती नव्हती. आता पिता मिळाला तर माता अंतरली. आपल्या प्रिय मातेच्या वियोगाने दोन्ही बंधू अत्यंत दुःखी झाले. रामही हे अपार दुःख सहन करू शकले नाही.

काही काळानंतर रामदेखील राज्य सोडून निघून गेले. अयोध्येचा राज्यकारभार वडील बंधू लवाने सांभाळला. दोन्ही भावांनी अनेक वर्षे राज्य केले. ते आपसात कधी भांडले नाहीत. त्यांची प्रजा सुखी होती. तिच्या कल्याणासाठी दोन्ही भावांनी मोठे कार्य केले.



# भरत आणि सिंहशावक :

पुरुवंशातील दुष्यंत राजा अत्यंत देखणा, गुणवान व पराक्रमी होता. देवांचा राजा इंद्रसुद्धा संकटसमयी त्याची मदत मागत असे. असाच एकदा देवासुरांच्या युद्धानंतर विमानात बसून तो आपल्या राज्यात परत येत होता. त्याचे विमान हलके हलके मेघांमधून खाली उतरत होते. दुष्यंत मुग्ध होऊन खाली पसरलेल्या धरतीचे सौंदर्य निरखीत होता. हळूहळू विमान एका आश्रमासमोर येऊन थांबले. तो मारीच ऋषींचा आश्रम होता. ऋषींचे दर्शन करण्याच्या हेतूने राजा रथातून खाली उतरला.

वनाचे सौंदर्य पाहात रमतगमत आश्रमाकडे जात असता अचानक त्याच्या कानावर एका स्त्रीचा आवाज आला, 'नाही, नाही बाळा! जरा माझं ऐक तरी. सोडून दे बघू त्या सिंहाच्या पिल्लाला!' राजाने वळून पाहिले तो एका अत्यंत सुंदर व तेजस्वी बालकाने सिंहिणीजवळून तिचा छावा उचलून घेतला होता. छाव्याचे तोंड उघडण्याचा प्रयत्न करीत तो म्हणत होता, 'उघड तुझं तोंड, पाहू तरी किती दात आहेत ते!'

आश्रमातील दोन तापसी त्याला परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत होत्या.

दुष्यंत त्या बालकाकडे पाहातच राहिला. का कोण जाणे पण त्याला जवळ घेऊन मनसोक्त कुरवाळावेसे राजाला वाटू लागले. इतक्यात एक तापसी त्याला म्हणाली, 'बाळ भरता, तू छाव्याला सोडले नाहीस तर सिंहीण तुझ्यावर तुटून पडेल बघ!'

नाक उडवून भरत म्हणाला, 'सिंहिणीला कोण भितो!'



त्याला भीती दाखविणे व्यर्थ होते. तापसी हैराण झाली. याला आता समजवायचे तरी कसे! ती पुन्हा म्हणाली, 'बाळ, तू त्या छाव्याला सोडून दिलेस तर मी तुला एक सुंदर खेळणे देईन.'

परंतु भरत सहजासहजी ऐकणारा नव्हता. आपला छोटासा हात पसरून तो म्हणाला, 'अगोदर खेळणं दे.'

दुष्यंत चुपचाप जवळ उभा राहून गंमत पाहात होता. भरताने हात पसरला तोच राजाची दृष्टी बालकाच्या तळहातावर पडली. त्यावरील रेषा पाहून तो चकित झाला. बालकाच्या हातावर चक्रवर्ती



सम्राटपदाचा योग दिसत होता. हे बालक निश्चितच असामान्य दिसते. पण हा या आश्रमात कसा आला?

राजा विचारमग्न झाला असता एक तापसी दुसरीला म्हणाली, ‘फक्त खेळणं द्यायचं कबूल करून ऐकणार नाही हा. इतक सोपं नाही याला समजावणं. आश्रमात मातीचा एक रंगीत मोर आहे तो घेऊन येते मी.’ असे म्हणून ती आश्रमाकडे निघून गेली.

इतक्यात दुसऱ्या तापसीची नजर राजावर पडली. त्याला पाहून तिच्या जिवात जीव आला. त्याच्याजवळ जाऊन ती म्हणाली, ‘महाराज, आपण या बालकाला थोडं समजावावं तरी. कदाचित आपलं ऐकून तो या सिंहशावकाला सोडूनही देईल.’



राजाने हासून विचारलं, 'कोणाचा आहे हा मुलगा ! हा तर एखाद्या राजपुत्रा-सारखा दिसत आहे. हा आश्रमात कसा आला ?'

तापसी म्हणाली, 'आपले अनुमान बरोबर आहे, राजन, भरत पुरुवंशाचा राजकुमार आहे'

पुरुवंशाचे नाव ऐकताच दुष्यंत दचकला.

इतक्यात पहिली तापसी मातीचा मोर घेऊन आली. तो भरताला देण्यासाठी पुढे होताच ती एकदम ओरडली. भरताच्या दंडावर त्याचा ताईत नव्हता. तापसीने घाबरून विचारलं, 'बाळ भरता, तुझा ताईत कुठे आहे ? किती बरं त्रास द्यायचा हा ?

तापसींसह राजाही ताईत शोधू लागला. ताईत तिथेच जमिनीवर पडला होता. तो उचलायला राजा वाकला इतक्यात तापसी ओरडून म्हणाली, 'थांबा राजन, त्याला हात लावू नका.' इतक्यात त्याने तो उचललाही होता.

तापसी स्तंभित होऊन राजाकडे पाहातच राहिली. राजाने आश्चर्याने विचारले, 'इतकं आश्चर्यचकित होण्यासारखं काय झालं ? हा घ्या ताईत आणि बांधा तो भरताच्या दंडावर.'

त्याच्या शब्दाने तापसी शुद्धीवर आली. तिने सांगितले की मारीच ऋषींनी हा ताईत भरताच्या दंडावर बांधून असे सांगितले होते की, 'जर तो खाली पडला तर भरताच्या मातापित्यानेच तो उचलून घ्यावा. दुसऱ्या कोणी त्याला हात लावला तर ताईताचा साप होऊन त्याला दंश करील.

तापसीचे शब्द ऐकताच भरत आपला पुत्र असल्याचा संशय खरा असल्याचे दुष्यंताला कळून चुकले. त्याच्या डोळ्यात आनंदाश्रू भरून आले.'

एवढ्यात भरताला सिंहशावकाचा कंटाळा आला होता. तो म्हणाला, 'आई कुठाय ? मला तिच्याकडे जायचंय !'

दुष्यंत त्याला प्रेमाने म्हणाला, 'चल बाळ, आपण दोघेही तुझ्या आईकडे जाऊ या."

भरत ताबडतोब म्हणाला, 'तुम्ही मला नका बाळ म्हणू! महाराज दुष्यंत माझे पिता आहेत.'

भरताबरोबर आश्रमाकडे जात असता दुष्यंताला एक एक ...न सर्व गोष्टी आठवू लागल्या.

शकुंतला त्याच्या दरबारी आली असता तो तिला ओळखू शकला नव्हता. तेव्हा काय झाले होते त्याच्या बुद्धीला कोण जाणे? कुठे भटकली असेल ती? किती कष्ट सहन करावे लागले असतील बिचारीला! पण पिता कण्वाच्या आश्रमात न जाता मारीचऋषींच्या आश्रमात कशी आली ती? राजा विचारात गुंगून गेला होता.

कण्वऋषींच्या आश्रमातच तर त्याने प्रथम शकुंतलेला पाहिले होते. एकदा तो शिकार खेळायला गेला होता. एका हरणाने त्याला खूप पळायला लावले होते. त्याचा पाठलाग करता करता तो आश्रमात जाऊन पोचला होता. तेथे आपल्या सख्यांसह वृक्षलतांना पाणी देणाऱ्या शकुंतलेला त्याने पाहिले. इतकी सुंदर युवती त्याने राजमहालातसुद्धा पाहिली नव्हती. शकुंतलेला पाहाताच तिच्याशी विवाह करण्याचा निश्चय त्याने केला. कण्वऋषी त्यावेळी तीर्थयात्रेला गेले होते.

शकुंतलेला देखील दुष्यंत राजा आवडला होता. दोघांनी आश्रमात विवाह केला. काही दिवस राजा आश्रमातच राहिला. परंतु राज्यकारभार सोडून तो किती दिवस तेथे राहू शकणार होता? कण्वऋषीही परत आले नव्हते. त्यामुळे तो शकुंतलेलाही आपल्याबरोबर घेऊन जाऊ शकत नव्हता.

शेवटी राजाला परत जावे लागले. त्याने शकुंतलेचा व इतर आश्रमवासियांचा निरोप घेतला. आपली आंगठी तिला देऊन तिला घेण्यासाठी आपल्या मंत्र्याला पाठविण्याचे आश्वासन दिले. राजा निघून गेला.

एके दिवशी शकुंतला विमनस्कपणे बसली असता अचानक दुर्वासऋषी तेथे आले. दुर्वास अत्यंत रागीट म्हणून प्रसिद्ध होते. थोड्या थोड्या गोष्टींमुळे संतापून ते शाप देऊन बसत. लोक त्यांना भीत असत. ते आल्याचे शकुंतलेला कळले नाही. बस, संतापून ऋषींनी शाप दिला, 'तू ज्याच्या ध्यानात मग्न आहेस तो तुला विसरून जाईल.' एवढे रामायण होऊनही शकुंतलेला काहीं कळले नाही. ती आपल्यांच नादात होती. भयभीत होऊन सखी प्रियंवदेने ऋषीची क्षमायाचना केली. त्यावर ऋषी म्हणाले, 'माझा शाप खोटा होणार नाही, पण आपण दिलेली खूण पाहून त्याला पुन्हा हिचे स्मरण होईल'. इतके बोलून दुर्वासऋषी तेथून निघून गेले.

आणि झालेही असेच! तीर्थयात्रेहून परत आलेल्या कण्वऋषींना दुष्यंत शकुंतलेच्या विवाहाची बातमी ऐकून खूप आनंद झाला. ते आपल्या कन्येला पतिगृही पाठविण्याची तयारी करू लागले. चांगला मुहूर्त शोधण्यात आला.

शकुंतलेला आपला आश्रम, आश्रमवासी मंडळी व पित्यासमान असलेल्या कण्वऋषींना सोडताना फार दुःख झाले. स्वहस्ते लावलेल्या वृक्ष-लतांना आलिंगन देऊन ती रडली. आपल्या प्रिय मृगाचा निरोप घेतला. आणि सर्वांना दुःखमग्न सोडून ऋषीकुमारांसह ती पतिगृही जाण्यास निघाली.

शकुंतला ऋषीकुमारांसह दुष्यंतराजाच्या महालात गेली. पण राजा तिला ओळखूसुद्धा शकला नाही. शकुंतलेने आपले मुखावगुंठण दूर केले. तिच्या सौंदर्याने सर्व महाल उजळून गेला. तरीही राजा तिला ओळखू शकला नाही. शकुंतलेच्या दुःखाला पारावार उरला नाही. तिला वाटले आपली अंगठी पाहून राजाला सर्व स्मरेल. पण दुर्दैव असे की आंगठीही कुठेतरी हरवली होती.

लज्जित आणि अपमानित होऊन शकुंतला महालाबाहेर पडली. दुर्वासाच्या शापामुळे दुष्यंताला तिचे विस्मरण पडले हे तिला काय ठाऊक! ऋषीकुमार

तिला कण्वाच्या आश्रमाकडे घेऊन निघाले. परंतु शकुंतलेने ते नाकारले. कोणत्या तोंडाने वडिलांकडे जायचे! ऋषीकुमारांनी तिला हेमकूट पर्वतावरील मारीचऋषींच्या आश्रमात नेऊन सोडले.

शकुंतला गेल्यानंतर दुष्यंताच्या राजधानीतील एक आश्चर्यकारक घटना घडली. एक कोळी बाजारात राज्याची आंगठी विकत असताना



पकडला गेला. आंगठी पाहाताच राजाने ती ओळखली. हीच आंगठी त्याने शकुंतलेला दिली होती. गंगेची पूजा करताना ती तिच्या बोटातून गळून पडली होती व एका मासोळीने ती गिळंकृत केली होती.

राजा सारखा अस्वस्थ राहू लागला. त्याच्या पश्चात्तापाला पारावार उरला नव्हता. कुठे असेल बरे शकुंतला ? तिला शोधून आणून तिची क्षमा मागून तिला महालात आणल्याशिवाय त्याला चैन पडले नसते.

त्याच वेळी देव आणि असुर यांच्यात लढाईला तोंड लागते. इंद्राने दुष्यंताची मदत मागितली. युद्धावरून परत येताना राजा हेमकूटपर्वतावर उतरला तेथे त्याला त्याचा पुत्र भेटला.

याप्रकारे विचार करीत दुष्यंत भरत आणि तापसीबरोबर आश्रमाकडे चालला होता.

इतक्यात शकुंतलादेखील भरताला शोधत तिथे येऊन पोचली. दुष्यंताला पाहाताच ती थबकून उभी राहिली. आईच्या डोळ्यांना आसवांच्या धारा लागलेल्या पाहून भरताने विचारले, 'हे कोण आहेत आई ? हे कोण आहेत आई ? हे मला 'बाळ' का म्हणून म्हणतात ?'

स्वतःला सावरून शकुंतलेने डोळे पुसले. ती भरताला म्हणाली, 'बाळ यांना प्रणाम कर. हेच तुझे वडील आहेत.'

माता, पिता, आणि पुत्रांनी जाऊन मारीचऋषींना वंदन केले. दुष्यंताने सर्व हकिगत सांगून शकुंतला व भरत यांना सोबत नेण्याची अनुमती मागितली.

एका शुभदिनी शकुंतला व भरत यांनी आश्रमाचा निरोप घेतला. कण्वमुनींच्या आश्रमातील निरोपप्रसंग तिला आठवला. त्यानंतर किती आपदा सहन केल्या होत्या तिने. परंतु आजचा दिवस किती भाग्यशाली होता !

भरत निरोप घेऊ लागला तेव्हा आश्रमवासीयांना आसवे आवरली नाहीत. तो सर्वांना अत्यंत प्रिय होता, आश्रमाची शोभा होता तो. भरताच्या मस्तकावर हात

टेकून भरल्या कंठाने मारीचऋषी म्हणाले, 'आजचा दिवस फार शुभ आहे. बाळा! तू आज वडिलांच्या घरी जात आहेस.'

मग ते दुष्यंताला म्हणाले, 'राजन, तुमचा पुत्र अत्यंत पराक्रमी होईल. तो दुष्यंताचा मुलगा म्हणून नव्हे तर तुम्ही त्याचे पिता म्हणून विख्यात व्हाल. माझी भविष्यवाणी कधीही खोटी ठरणार नाही. ईश्वर याला शतायुषी करो.'

वनाच्या सीमेपर्यंत आश्रमवासी त्यांना निरोप देण्यास आले.

राजधानीत या तिघांचे जोरदार स्वागत करण्यात आले. संपूर्ण नगर तोरणांनी व मंगल कलशांनी सजविले होते. दीपोत्सव साजरा करण्यात आला. नृत्य-गायनाचा जल्लोष कितीतरी दिवस चालू होता. कोणीही रिक्त हस्ताने जाऊ नये म्हणून खजिना खुला करण्यात आला. साऱ्या राज्यात आनंदीआनंद झाला.

भरताच्या नव्या जीवनाचा प्रारंभ झाला. दासींनी त्याला गुलाबजलाने न्हाऊ घातले. राजपुत्राला साजेशी रेशमी वस्त्रे नेसवली, गळ्यात बहुमोल मोत्यांची माळ घातली, शिरावर रत्नखचित मुकुट ठेवला आणि कंबरेला तलवार बांधली. तपस्वी बालक भरत तेजस्वी राजकुमार बनला–प्रथम त्याने कुलदेवतेला प्रणाम केला मग कुलगुरूला व शेवटी मात्यापित्याला. मग मोठ्या ऐटीत पित्याबरोबर राजदरबारात जाऊन बसला. त्याला पाहून हे सर्व तो प्रथमच करीत आहे असे कोणालाच वाटले नाही. पिता-पुत्राची अनुपम जोडी पाहून प्रजा आनंदित झाली. देवांनी स्वर्गातून पुष्पवर्षाव केला व आशीर्वाद दिले.

दुष्यंतराजाने पुष्कळ वर्षे राज्य केले. त्यानंतर भरत राजा झाला. सिंह शावकांशी खेळणारे बालक चक्रवर्ती सम्राट बनले. असे म्हणतात की भारतावरूनच या देशाला 'भारतवर्ष' असे नाव पडले.

